**गृहनिर्माण व इमारत बांधकाम विषयक सांख्यिकी गोळा करणे (१००% केंद्र पुरस्कृत योजना) या योजनेस मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः असासं १३१४/प्र.क्र.११५/का.१४१७

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०१ जुलै, २०१५.

**प्रस्तावना -**

१. संचालक, राष्ट्रीय भवन निर्माण संघटना, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी अ.शा. पत्र क्र. २३/८/२००७-SE NBO, दिनांक २८ एप्रिल २०१४ अन्वये बांधकाम विषयक माहिती विहित प्रपत्रांमध्ये गोळा करण्याबाबत कळविले आहे.

२. राष्ट्रीय भवन निर्माण संघटना, नवी दिल्ली ही केंद्र शासनाची संस्था गृहनिर्माण व नागरी गरीबी उपशमन मंत्रालय, केंद्र शासन, नवी दिल्ली यांच्या अधिपत्याखाली कार्यरत आहे. केंद्र शासनाची बांधकाम विषयक सांख्यिकी माहितीची उपयोगिता लक्षात घेऊन राज्यनिहाय बांधकामाची मंजूरी व बांधकाम पूर्ण झाल्यानंतर बांधकाम पूर्णतेची माहिती, बांधकाम साहित्याच्या किंमती, मजूरीचे दर इ. विविध प्रकारच्या बांधकाम विषयक सांख्यिकीचे त्रैमासिक तत्त्वावर संकलन, संस्करण आणि अंतिम माहितीचे प्रकाशन हे या संस्थेचे प्रमुख उद्दीष्ट आहे.

३. उत्पादन व्यवस्थेत अर्थव्यवस्थेच्या विविध क्षेत्रांतील सहसंबंधांतून घरे व इमारत बांधकाम क्षेत्रातील कार्यविधींमुळे प्रभावशाली गुणकीय परिणाम होत असल्याने सदर क्षेत्राबाबतच्या अद्ययावत आकडेवारीची गरज मध्यवर्ती बँकेला व नियोजनकारांना भासत आहे. सदर बांधकाम विषयक सांख्यिकी उपलब्ध झाल्यामुळे बांधकाम क्षेत्रातील विकासाच्या योजना राबविणाऱ्यांना व धोरण आखणाऱ्यांना मार्गदर्शन उपलब्ध होईल.

४. या क्षेत्रातील स्थूल मूल्यवृद्धीची तसेच इमारत सामुग्री, कामगार इ. बाबींबाबतची मागणी व पुरवठा याची माहिती उपलब्ध होईल. यास्तव राष्ट्रीय भवन निर्माण संघटना, केंद्र शासन, नवी दिल्ली यांच्या सूचनेनुसार सदर योजना राज्यात राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

गृह व इमारत बांधकाम विषयक सांख्यिकी गोळा करणे (१०० % केंद्र पुरस्कृत योजना) ही योजना राज्यातील परिशिष्ट अ मध्ये दर्शविलेल्या ३२ शहरांमध्ये राबविण्यासाठी या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजना राज्यात अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत राबविण्यात यावी.

३. या योजनेअंतर्गत सन २०१४-१५ साठी वर्षाच्या प्रत्येक त्रैमासिक कालावधीसाठी निवडलेल्या ३२ शहरांमधील (महानगरपालिका, नगरपालिका व निवासी इमारत बांधकामांसाठी परवानगी देणा-या यंत्रणांकडून) राष्ट्रीय भवन निर्माण संघटनेने विहित केलेल्या खाली नमूद विविध प्रपत्रांमध्ये इमारत बांधकाम परवाना व पूर्णत्व प्रमाणपत्र, बांधकाम साहित्यांच्या किंमती, बांधकाम मजूरीचे दर, Property Circle Rates, निवासी घरे खरेदी विषयक दराची व निवासी घरे भाडयाने देण्याच्या दराची माहिती इत्यादी सांख्यिकी गोळा करणे व त्याची BRIKS या सॉफ्टवेअर प्रणालीमध्ये नोंदणी करणे आणि ५ निवडक शहरांत (महानगरपालिका, नगरपालिका व निवासी इमारत बांधकामांसाठी परवानगी देणाऱ्या यंत्रणांकडून) सन २०११-१२, २०१२-१३ व २०१३-१४ या वर्षातील प्रत्येक त्रैमासिक कालावधीसाठी Housing Start-Up Index - २ परिगणित करण्यासाठी आवश्यक निवासी बांधकाम परवानग्या व इतर इमारत विषयक सांख्यिकी गोळा करणे व त्याची BRIKS या सॉफ्टवेअर प्रणालीमध्ये नोंदणी करणे ही कामे अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने त्यांच्या कर्मचाऱ्यांमार्फत व कंत्राटी तत्त्वावर खाजगी संस्थेची नेमणूक करुन बाह्यस्त्रोताद्वारे करावी.

१) प्रपत्र-१ :- नविन निवासी इमारतींसाठी बांधकाम परवाने
२) प्रपत्र-२ :- देण्यात आलेल्या इमारत बांधकाम परवाने आणि पूर्णत्त्व प्रमाणपत्रे यांची संख्या
३) प्रपत्र-३:- बांधकाम साहित्याचे बाजारभाव दर
४) प्रपत्र-४:- बांधकाम मजूरांच्या मजूरीचे दर
५) प्रपत्र-५:- मोडकळीस आलेली/धोकादायक आणि अनधिकृत बांधकामे
६) प्रपत्र-६:- निवासी गृह मालमत्तांचे सर्कल रेट
७) प्रपत्र-६-१:- निवासी गृह मालमत्तांचे बाजारभाव दर
८) प्रपत्र-६-२:- निवासी गृह मालमत्तांचे भाड्याचे दर

४. या योजनेअंतर्गत संकलित केली जाणारी माहिती अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने राष्ट्रीय भवन निर्माण संघटना, नवी दिल्ली यांना त्यांनी विहित केलेल्या पद्धतीने उपलब्ध करुन द्यावी.
या योजनेअंतर्गत केंद्र शासनाच्या सूचनेनुसार खालील बाबींवर खर्च करणे अनुज्ञेय आहे :-

१) सदर बांधकाम विषयक सांख्यिकी गोळा करुन त्याची संगणकावर नोंदणी करणे यासाठी निव्वळ कंत्राटी तत्वावर नेमलेल्या बाह्य संस्थेस/व्यावसायिक व्यक्तींना मोबदला देणे.
२) सदर कामासाठी निवडलेल्या शहरातील महानगरपालिका, नगरपालिका व इमारत बांधकाम विषयक परवानगी देणा-या इतर यंत्रणांमधील अधिकारी/कर्मचारी तसेच संचालनालयातील अधिकारी/कर्मचारी यांना मानधन देणे
३) या विषयाबाबत प्रशिक्षण सत्रे व कार्यशाळा आयोजित करणे
४) क्षेत्रीय भेटींसाठी होणारा प्रवास व तद्नुषंगिक खर्च.
५) अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सदर काम पाहणाऱ्या कक्षासाठी उपभोग्य बाबींची (Consumables) खरेदी करणे.
६) आकडेवारी गोळा करण्यासाठी आवश्यक असलेल्या प्रपत्रांची छपाई.
७) संगणक खरेदी, दुरुस्ती व देखभाल

५. उपरोक्त बाबींवरील खर्च मागणी क्र. ओ-९, ३४५४ जनगणना सर्वेक्षण व सांख्यिकी, ०२ सर्वेक्षण व सांख्यिकी, ११२ आर्थिक सल्ला व सांख्यिकी, ०३ नियोजनासाठी आकडेवारी , (०३) (२३) गृह व इमारत बांधकाम विषयक सांख्यिकी गोळा करणे (१००% केंद्र पुरस्कृत योजना) (३४५४०५८१) (योजनांतर्गत) (दत्तमत), ३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर) या उपलेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.
६. या उपशीर्षाखाली होणाऱ्या खर्चासाठी संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय हे नियंत्रण अधिकारी असतील व लेखा अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. या योजनेंतर्गत होणाऱ्या खर्चाचा हिशोब त्यांनी स्वतंत्रपणे ठेवावा व त्यासाठी विहित लेखापद्धती अवलंबिण्यात यावी
७. राष्ट्रीय भवन निर्माण संघटना, नवी दिल्ली यांच्याकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या सूचना विचारात घेऊन सदर योजनेची अंमलबजावणी अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने करावी.
८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७८/१५/व्यय-८, दिनांक ०८.०६.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०११३४८४७४४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.07.01 13:51:33 +05'30'

**वसंत कुळकर्णी**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
४. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई
५. निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७.वित्त विभाग (व्यय-८, अर्थ-३, अर्थ-१६, अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई
८. कार्यासन अधिकारी (का-१४११/१४१४/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
९.निवडनस्ती, का-१४१७

## परिशिष्ट अ
## राष्ट्रीय भवन निर्माण संघटना (NBO) यांनी सुचविलेली बांधकाम विषयक सांख्यिकी गोळा करावयाच्या जिल्ह्यांची / शहरांची नावे

| अ.क्र. | जिल्हा | बांधकाम सांख्यिकी गोळा करण्यासाठी निवडलेली शहरे (महानगरपालिका/नगरपालिका) (२०१४-१५) आर्थिक वर्षाच्या प्रत्येक तिमाहीकरिता | Housing Start- up Index-२ करिता माहिती गोळा करण्यासाठी निवडलेली शहरे (महानगरपालिका) (२०११-१२, २०१२-१३,२०१३-१४) प्रत्येक आर्थिक वर्षाच्या प्रत्येक तिमाही करिता |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मुंबई शहर | **महानगरपालिका**- बृहन्मुंबई | **महानगरपालिका**- बृहन्मुंबई |
| २ | मुंबई उपनगर | **महानगरपालिका**- बृहन्मुंबई | **महानगरपालिका**- बृहन्मुंबई |
| ३ | ठाणे | **महानगरपालिका** - ठाणे, कल्याण डोंबवली, नवी मुंबई, मिरा-भाईदर, भिवंडी-निजामपूर, उल्हासनगर<br>**नगरपालिका**- अंबरनाथ, बदलापूर | |
| ४ | रायगड | **नगरपालिका**-पनवेल | |
| ५ | पालघर | **महानगरपालिका**- वसई-विरार | |
| ६ | नाशिक | **महानगरपालिका** - नाशिक, मालेगाव | |
| ७ | धुळे | **महानगरपालिका** - धुळे | |
| ८ | जळगाव | **महानगरपालिका** - जळगाव<br>**नगरपालिका**- भुसावळ | |
| ९ | अहमदनगर | **महानगरपलिका**- अहमदनगर | |
| १० | पुणे | **महानगरपालिका**- पुणे, पिंपरी-चिंचवड | **महानगरपालिका**- पुणे |
| ११ | सांगली | **महानगरपालिका** - सांगली-मिरज-कुपवाडा | **महानगरपालिका** - सांगली-मिरज |
| १२ | सोलापूर | **महानगरपालिका** - सोलापूर | |
| १३ | कोल्हापूर | **महानगरपालिका**- कोल्हापूर<br>**नगरपालिका**- इचलकरंजी | |
| १४ | औरंगाबाद | **महानगरपालिका**- औरंगाबाद | |
| १५ | जालना | **नगरपालिका**- जालना | |
| १६ | परभणी | **महानगरपालिका**- परभणी | |
| १७ | नांदेड | **महानगरपालिका**- नांदेड-वाघाळा | **महानगरपालिका**- नांदेड-वाघाळा |
| १८ | लातूर | **महानगरपालिका**- लातूर | |
| १९ | अकोला | **महानगरपालिका**-अकोला | |
| २० | अमरावती | **महानगरपालिका**-अमरावती | |
| २१ | नागपूर | **महानगरपालिका**- नागपूर | **महानगरपालिका**- नागपूर |
| २२ | चंद्रपूर | **महानगरपालिका**- चंद्रपूर | |